सन २०१९-२० करीता विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत प्राप्त अतिरिक्त निधी वितरणास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०२०/प्र.क्र.४२/का.-१९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८/०३/२०२०

वाचा -

१. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र F.No.११०१४/०२/२०१९-SCA,दि. ०५/०२/२०२०
२. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र F.No.११०१५/०१(१४)/२०१९-TSP,दि. २५/०२/२०२०

प्रस्तावना -

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१),विशेष केंद्रिय सहाय्य व आदिम जमाती विकास कार्यक्रम अंतर्गत अतिरिक्त प्रस्तावांना मंजूरी प्रदान करण्याबाबत जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली येथे प्रकल्प मुल्यमापन समितीची (Project Appraisal Committee-PAC) बैठक दि. २१/०१/२०२० रोजी आयोजित करण्यात आलेली होती. या बैठकीमध्ये उपरोक्त योजनांतर्गत प्रस्तावांचे केंद्र शासनास सादरीकरण करण्यात आलेले आहे. केंद्र शासनाने सदर प्रस्तावांना दि. ०५/०२/२०२० रोजीच्या पत्रान्वये मंजूरी प्रदान केलेली आहे.

२. केंद्र शासनाने सन २०१९-२० करिता विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत रु. ४००.०० लक्ष (रु. चार कोटी फक्त) इतका अतिरिक्त निधी मंजूर केला आहे. केंद्र शासनाच्या दि.२५.०२.२०२० च्या पत्रान्वये रू.४००.०० लक्ष इतका निधी वितरीत झालेला असून सदर निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाने प्रमाणित केले असून सदर निधी आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक यांना वितरीत करण्याची बाब विचाराधिन आहे.

## शासन निर्णय (Government resolution)-

केंद्र शासनाने सन २०१९-२० करिता विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत मंजूर निधी रु. ४००.०० लक्ष (रु. चार कोटी फक्त ) पुढील कामांकरीता खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| Sr. No | योजनेचे नाव | योजना राबविण्याचे ठिकाण | सन २०१९-२० करिता मंजूर अतिरिक्त निधी (रु. लाखात) | वितरीत करण्यात येणारा निधी (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| 1 | Innovate Skill and Design trainings for tribal artisans in collaboration with Asian Heritage Foundation | 1. Palghar- Warli<br>2. Jawhar, Chandrapur, Bhamragad,Pen -Bamboo<br>3. Bhamragad (Mahua Honey, Bees wax candles, forage foods)<br>4. Gondia (Gondia hand painting)<br>5. Bhandara (Hand weaving Tussar) | 150.00 | 150.00 |
| 2 | Comprehensive dental treatment for students of ashram schools | All Ashram Schools of PO Pen and Shahapur | 50.00 | 50.00 |
| 3 | Atal Arogya Vahini-<br>Dedicated Ambulance Service for Ashram Schools | Across Maharashtra | 200.00 | 200.00 |
| **Total** | | | 400.00 | 400.00 |

२. उपरोक्त रू.४००.०० लक्ष (रु. चार कोटी फक्त) खर्च मागणी क्र. टी-५, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागसवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०२) (४३) ,विशेष केंद्रिय सहाय्य अन्वये केंद्रीय सहाय्य (केंद्र योजना), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२२५ E०४२) यामधील सन २०१९-२० करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून करण्यात यावा.

३. सदर निधी अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी वितरीत निधीच्या मर्यादेत निधी तातडीने आहरीत करण्याची दक्षता घ्यावी व संबंधित अपर आयुक्त,आदिवासी विकास / प्रकल्प अधिकारी ,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प /योजना अंमलबजावणी यंत्रणा यांना वितरित करावा.

४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

**५.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११९/अर्थोपाय, दिनांक १७.०३.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१८१३५७५८१९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Waje Prakash Vijay

Digitally signed by Waje Prakash Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, serialNumber=400892e5e82479e4f3c8cf46538dc917b7071e979796d37178d3b709e19155ab, cn=Waje Prakash Vijay
Date: 2020.03.18 14:00:59 +05'30'

**(प्रकाश वाजे)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) सहसचिव /उपसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
९) अपर आयुक्त,आदिवासी विकास,ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
१०) अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१३) नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अवर सचिव, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.